**विदर्भ व मराठवाडा विभागातील कृषिपंपांचे उच्च दाब वितरण प्रणालीद्वारे उर्जीकरण करण्याकरीता महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी यांना द्यावयाचे सहाय्यक अनुदान सन २०१९-२०२०**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्र.निधीवि-२०१९/प्र.क्र.७७/ऊर्जा-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ११ डिसेंबर, २०१९

संदर्भ :

१. शासन निर्णय उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र.संकीर्ण-२०१५/प्र.क्र.४५/ ऊर्जा-५, दिनांक ३१.१०.२०१७
२. शासन निर्णय उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र.निधिवि-२०१८/प्र.क्र.१९/ ऊर्जा-३, दिनांक २५.०३.२०१९
३. शासन निर्णय उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र.निधिवि-२०१८/प्र.क्र.६९(२)/ ऊर्जा-३, दिनांक २८.०३.२०१९
४. शासन निर्णय उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र.निधिवि-२०१८/प्र.क्र.२०(१)/ ऊर्जा-३, दिनांक ३०.०३.२०१९
५. महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, मुंबई यांचे क्र.मु.म.व्य.(सांघिक वित्त)/ ४१८९, दिनांक ०२.०८.२०१९

**प्रस्तावना** :-

विदर्भ व मराठवाडा विभागामध्ये उच्च दाब वितरण प्रणालीअंतर्गत कृषि पंप विद्युतजोडणी देण्याची योजना स्वतंत्रपणे राबविण्यासाठी सन २०१८-१९ मध्ये नवीन लेखाशीर्ष २८०१५५१६ उघडून त्याखाली एकूण रुपये ७२० कोटी तरतूद वितरीत करण्यात आली आहे. त्यापैकी रुपये २३०.०० कोटी नवीन कृषि पंपाना विज जोडणी देण्याच्या उच्च दाब वितरण प्रणालीअंतर्गत कार्यक्रमासाठी वापरण्यात आले आहेत. उर्वरित रुपये ४९०.०० कोटी रक्कम विदर्भ व मराठवाडा विभागामध्ये पारंपारीक पद्धतीने कृषि पंप विद्युतजोडणी जोडणी देण्यासाठी वापरण्यात आले आहेत.

३. नवीन कृषि पंपाना उच्च दाब वितरण प्रणालीअंतर्गत विज जोडणी देण्याबाबतच्या विदर्भ व मराठवाडा विभागासाठीच्या रुपये २२४८.०९ कोटी रक्कमेच्या एकूण मंजूर कार्यक्रमातील सन २०१८-१९ मध्ये आदिवासी उपयोजनेअंतर्गत रुपये ५९.४३ कोटी व विशेष घटक योजनेंतर्गत रुपये ३०३.१६ कोटी व सर्वसाधारण योजनेतून रुपये २३०.०० कोटी याप्रमाणे एकूण ५९२.५९ कोटी तरतूद वितरीत करण्यात आली आहे. आता सन २०१९-२० मध्ये अर्थसंकल्पित तरतूद रुपये ९०२.७१९९ कोटी रक्कम वितरणाबाबत महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्या, प्रकाशगड वांद्रे, यांनी प्रस्ताव सादर केला असून सदर प्रस्तावाच्या अनूषंगाने निधी वितरणाची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांना सदर योजनेसाठी सन २०१९-२० मध्ये मंजूर असलेल्या रु.९०२.७१९९ कोटी इतक्या अर्थसंकल्पिय तरतूदीमधून वितरणास उपलब्ध असलेल्या ६० टक्के रक्कम रुपये ५४१.६३१९४ कोटीच्या मर्यादेत अवितरीत असलेली रुपये ५४१.६३ कोटी (रुपये पाचशे एक्केचाळीस कोटी त्रेसष्ठ लाख फक्त) इतकी रक्कम वितरीत करण्यास शासन मंजुरी देण्यात येत आहे. सदर शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाची रक्कम ज्या कारणासाठी मंजूर करण्यात आलेली आहे त्याच कारणासाठी उपयोगात आणली जाईल याची दक्षता घेण्यात यावी.

२. वरील बाबीचा खर्च "मागणी क्रमांक के-६, २८०१ वीज, ०५ पारेषण व वितरण, १९९, इतर अशासकीय संस्थंना सहाय्य, (००) (०२) विदर्भ व मराठवाडा विभागातील कृषी पंपांना वीज जोडणी देणे (कार्यक्रम) (२८०१५५१६) ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व तो सन २०१९-२०२० या वित्तीय वर्षामध्ये, सदर योजनेसाठी मंजूर असलेल्या रु.९०२.७१९९ कोटी इतक्या तरतूदी मधुन भागविण्यात यावा.

३. सदर रक्कम अधिदान व लेखा अधिकारी यांच्या मार्फत कोषागारातून काढून महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, मुंबई यांना अदा करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून श्री.ना. रा. ढाणे, अवर सचिव व नियंत्रण अधिकारी म्हणून श्री. उ. द. वाळुंज, सह सचिव, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई ४०००३२ यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. त्यांनी महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, मुंबई यांना मंजूर झालेली रक्कम रुपये ५४१.६३ कोटी (रुपये पाचशे एक्केचाळीस कोटी त्रेसष्ठ लाख फक्त) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई येथून महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांच्या नांवे स्वतंत्ररित्या धनादेश काढून वितरीत करण्याची कार्यवाही करावी.

४. सदर लेखाशिर्षांतर्गत सन २०१९-२० करिता रु.९०२.७१९९ कोटीची अर्थसंकल्पिय तरतूद करण्यात आली आहे. तसेच या लेखाशिर्षाअंतर्गत एक वर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. वितरीत करण्यात येत असलेला निधी रु.५४१.६३ कोटी वित विभागाच्या दिनांक ०८.०७.२०१९ च्या शासन परिपत्रकानुसार अर्थसंकल्पित तरतूदीच्या ६०% च्या मर्यादेत आहे.

५. महाराष्ट्र विनियोजन विधेयक-२०१९, वित्त विभाग, परिपत्रक क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३ दि.०१/०४/२०१९ च्या परिपत्रकातील तसेच वित्त विभाग, परिपत्रक क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३ दि.०८/०७/२०१९ च्या परिपत्रकातील अटींची पुर्तता होत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०१९१२१११४५८३४४६१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Nanasaheb Rajaram Dhane

Digitally signed by Nanasaheb Rajaram Dhane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industries, Energy and Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a71698611123263cde9d32423e9bb73044d91ed0cffad3b6267198ee5014159f, serialNumber=6c39e2858150dbdfcfe6cd25ed08adf59f4d2fd8c1ede1730735f604904bf3bb, cn=Nanasaheb Rajaram Dhane
Date: 2019.12.11 15:02:36 +05'30'

(ना. रा. ढाणे)
शासनाचे अवर सचिव

**प्रत:-**

१) अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, प्रकाशगड, वांद्रे, (पूर्व), मुंबई-५१

२) अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ सूत्रधार कंपनी मर्यादित, हाँगकाँग बँक बिल्डिंग, फोर्ट, मुंबई

३) सचिव, महाराष्ट्र विद्युत नियामक आयोग, वर्ल्ड ट्रेड सेंटर नं.१, १३ वा मजला, कफ परेड, कुलाबा, मुंबई-०५

४) मा.विरोधी पक्ष नेता विधानसभा / विधानपरिषद महाराष्ट्र विधान मंडळ, मंत्रालय, मुंबई.

५) महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई-४०००२०.

६) महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई-४०००२०.

७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.

८) अधिदान व लेखा अधिकारी, अराप / रालेवि-१, मुंबई.

९) अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.

१०) निवासी लेखा अधिकारी, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०००५१.

११) कक्ष अधिकारी (रोख), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई -४०००३२.

१२) विशेष कार्य अधिकारी (ऊर्जा-५), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.

१३) वित्त विभाग, (अर्थसंकल्प-१३ / साधनसंपत्ती / साऊ / व्यय-१६) मंत्रालय, मुंबई-३२.

१४) मुख्य विद्युत निरीक्षक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, सार्वजनिक बांधकाम प्रशासकीय इमारत, कर मार्ग रामकृष्ण चेंबूर, ३ रा मजला, चेंबुर, (पूर्व), मुंबई-४०००७१.

१५) निवडनस्ती (ऊर्जा-३) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई -४०००३२.